**सन २०२१-२२ मध्ये कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरिता (TRFA Pulses) सह अनुसूचित जाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा ₹ ५७३.३७ लाख निधी वितरीत करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असुअ-२०२१/प्र.क्र.१०७/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ जानेवारी, २०२२

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे,दि.१९/०४/२०१७
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र .संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४/११/२०२०
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र File No./1-22020 –NFSM, Dated: 04/05/2021.
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र No.NFSM/Extn-1/AAP 21-22/F.No.01/21/15361,दि.०७/०५/२०२१ .
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र १/राअसुअ/वाकृआ/प्रक्र.१/प्र.मान्यता/२१/१८९३९, दि.१६/०५/२१
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र File No. 2-17/2021-NFSM (FTS:E-97270), Dated: 16/06/2021
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राअसुअ-२०२१/प्र.क्र.३७/४-अे, दि.२४/०६/२०२१
८. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.२०-२७/२०१७-NFSM (CA-V),.दि.२८/०६/२०२१
९. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वि.प्र.१/राअसुअ/निवि२१-२२/प्र.क्र.०७/२१३४६/२०२१, दि.०६/०७/२०२१
१०. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१
११. सामाजिक न्याय विभागाचा शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.५/अर्थसंकल्प (विघयो), दि.२१/०१/२०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने संदर्भांकित दि. १६ जून, २०२१ रोजीच्या पत्रान्वये सन २०२१-२२ करीता या अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरिता (TRFA Pulses व कडधान्य बियाणे मिनिकीट सह) ₹ २२४८४.०० लाख इतक्या कृती आराखड्यास मंजूरी प्रदान केलेली आहे. त्यास दिनांक २४/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

सन २०२१-२२ करिता केंद्र शासनाने तिन्ही प्रवर्गाकरिता अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता (TRFA Pulses सह) पहिल्या हप्त्यापोटी केंद्र हिस्याचा एकूण ₹ ३३७२.६५ लाख निधी दि.२८ जून, २०२१ रोजी पिकनिहाय वितरीत केलेला आहे. तसेच राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातर्गत अन्नधान्य पिके योजनेतंर्गत निधी वितरण प्रक्रिया व निधी देखरेखीकरिता PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार केंद्र शासनाकडून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत अन्नधान्य पिके योजना SNA मार्क करण्यात आली आहे. त्यानुषंगाने कृषि

आयुक्तालयाच्या मागणीप्रमाणे अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता या अभियानातंर्गत अन्नधान्य पिकांकरीता पिकांकरीता (TRFA Pulses सह) सह प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा ₹ **३४४.०३ लाख** व राज्य हिस्याचा ₹ **२२९.३४ लाख** असा एकूण ₹ **५७३.३७ लाख** निधी, वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे .

**शासन निर्णयः**

१. सन २०२१-२२ करीता कृषी उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता (TRFA Pulses सह) **अनुसूचित जाती प्रवर्गासाठी** केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण **₹५७३.३७ लाख (रुपये पाच कोटी त्र्याहत्तर लाख सदोतीस हजार फक्त) निधी** या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी) पुणे, यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पिक निहाय उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या वितरीत निधीचे विवरण पुढीलप्रमाणे -

**(रु.लाख)**

| अ. क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके | अनुसूचित जाती प्रवर्ग | | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १ | भात | १०.७४ | ७.१६ | १७.९० |
| २ | गहू | ३.८३ | २.५५ | ६.३८ |
| ३ | कडधान्य | १९४.०६ | १२९.३७ | ३२३.४३ |
| ४ | भात पड क्षेत्रावर कडधान्य उत्पादन (TRFA Pulses) | १८.४७ | १२.३१ | ३०.७८ |
| ५ | भरडधान्य | ११.६३ | ७.७५ | १९.३८ |
| ६ | पौष्टिक तृणधान्य | १०५.३० | ७०.२० | १७५.५० |
| | **एकूण** | **३४४.०३** | **२२९.३४** | **५७३.३७** |

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्स्याचा **₹३४४.०३ लाख (तीन कोटी चौरेचाळीस लाख तीन हजार फक्त)** निधी व राज्य हिस्स्याचा **₹२२९.३४ लाख (दोन कोटी एकोणतीस लाख चौतीस हजार फक्त)** फक्त निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| **केंद्र हिस्याचे लेखाशिर्ष** | **राज्य हिस्याचे लेखाशिर्ष** |
|---|---|
| मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा) (६० टक्के) (अनुसूचित जाती उपयोजना) (२४०१ B१०५), ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००)(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा) (४० टक्के) (अनुसूचित जाती उपयोजना) (२४०१ B११४), ३३ अर्थसहाय्य |

३. सन २०२१-२२ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |

४. शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹ ५७३.३७ लाख निधी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी PFMS प्रणालीवर जिल्हा निहाय खर्चाची मर्यादा निश्चित करावी.

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रधान सचिव (कृषी) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१ विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३६८/२०२१/व्यय-१, दि.२७/१२/२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे .

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२८१२२३१३७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.01.28 12:23:48 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ,मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३. सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१४. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१५. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
२०. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती-४अे